पोलीस पाटील भरती प्रक्रियेच्या दरम्यान उमेदवारांकडून सादर होणा-या प्रमाणपत्रांच्या वैधतेची (Validity) योग्य तपासणी करणेबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः बिव्हीपी- २०२०/प्र.क्र.१९०/पोल-८**
२ मजला, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०६ नोव्हेंबर, २०२०

**वाचा:-** १) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांचे शासन निर्णय क्र.- राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/ क्रीयुसे-२, दि. १ जुलै, २०१६
२) सामान्य प्रशासन विभाग यांचे शासन निर्णय क्र.- प्रशिक्षण २०००/ प्र.क्र. ६१/२००१/३९, दि. १९ मार्च, २००३
३) माहिती तंत्रज्ञान (सा. प्र. वि.) विभाग यांचे शासन निर्णय क्र.- मातंस २०१२/ प्र.क्र.२७७/३९, दि. ४ फेब्रुवारी, २०१३

**परिपत्रक**

पोलीस पाटील हा शासनाचा शेवटचा प्रतिनिधी म्हणून गावपातळीवर कार्यरत असतो. गावातील कायदा व सुव्यवस्था राखणे ही महत्वाची जबाबदारी पोलीस पाटील यांच्यावर असते. महाराष्ट्र ग्राम पोलीस अधिनियम, १९६७ मधील कलम ३ मधील तरतुदीनुसार पोलीस पाटील यांच्या नियुक्ती संदर्भात उपविभागीय अधिकारी हे सक्षम प्राधिकारी (Competent Authority) आहेत.

२. राज्यातील पोलीस पाटील भरती प्रक्रियेदरम्यान मुलाखतीच्या वेळी काही ठिकाणी पोलीस पाटील पदाचे उमेदवार हे अर्हता म्हणून क्रिडा नैपुण्य / संगणक ज्ञान विषयक वैध नसलेली व बनावट कार्यपध्दतीचा अवलंब करुन प्रमाणपत्रे सादर करुन पोलीस पाटीलपदी निवड झाल्याचे चौकशीअंती निदर्शनास आले आहे.

३. क्रिडा नैपुण्य विषयक प्रमाणपत्राच्या अर्हतेबाबत, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय दि. १ जुलै,२०१६ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. त्यानुसार पोलीस पाटील पदाच्या उमेदवारानी मुलाखतीच्या वेळी सादर केलेल्या क्रिडा नैपुण्य प्रमाणपत्राची वैधतेबाबत नियुक्ती प्राधिकारी (उपविभागीय अधिकारी ) यांनी तपासणी / शहानिशा करण्यात यावी व पूर्ण तपासणीअंती खात्रीनंतरच पुढील कार्यवाही करावी.

४. तसेच संगणकीय ज्ञान अर्हतेबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १९ मार्च, २००३ व दि. ४ फेब्रवारी, २०१३ अन्वये मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MS-CIT परीक्षा प्रमाणपत्र तसेच शासन निर्णयामध्ये विहित केलेले अन्य संगणकीय अभ्यासक्रम विषयक प्रमाणपत्र वैध धरण्यात यावे.

५. तरी, पोलीस पाटील भरती प्रक्रियेमध्ये अनियमितता होणार नाही, याची दक्षता सर्व उपविभागीय अधिकारी यांनी नियुक्ती प्राधिकारी या नात्याने घ्यावी. अशा प्रकरणामध्ये अनियमितता आढळून आल्यास, याबाबत संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. यांची कृपया नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक क्र. २०२०११०६१५०४३१४७२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dhondu Pawar

Digitally signed by Sudhakar Dhondu Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=370693820257420609f4d474c2024d6ebdc571ea6ad2b769aa743bd3015cb5a3, serialNumber=ee05d69d6f5f431837c7addff9093dd5e97fd9ec63b0bc306c7f049f9d93d36c, cn=Sudhakar Dhondu Pawar
Date: 2020.11.06 15:07:21 +05'30'

**( सु. धों. पवार )**

अवर सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, म.रा. मुंबई.

२) सर्व पोलीस अधिक्षक,

३) सर्व जिल्हाधिकारी,

४) सर्व उप विभागीय अधिकारी

५) अपर मुख्य सचिव,(गृह) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव ,(गृह /विशेष), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

७) उप सचिव ,(पोल-८), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

८) निवडनस्ती (पोल-८).